डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली या विद्यापीठास सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात भारतीय कृषि अनुसंधान परिषद अर्थसहाय्यित योजनेअंतर्गत (राज्य हिस्सा २५ टक्के) ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) या बाबीकरीता अनुदान वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : कोकृवि ११२४/प्र.क्र.३९/७-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १९/०३/२०२४

**वाचा :-** १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि.०८.१२.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४.
२) नियंत्रक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली यांचे पत्र जा. क्र.डॉबासाकोकृवि/लेखा-२/१६३/२०२३, दि.२७.१२.२०२३.

**प्रस्तावना:-**

भारतीय कृषि अनुसंधान परिषद अर्थसहाय्यित योजनेंतर्गत डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठास सहायक अनुदान (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) योजनेसाठी ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) या बाबीकरीता राज्य हिस्स्याचा २५ टक्के प्रमाणे निधी वितरणाचा प्रस्ताव नियंत्रक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली यांनी संदर्भ क्र.२ अन्वये शासनास सादर केला आहे.

भारतीय कृषि अनुसंधान परिषद अर्थसहाय्यित योजनेसाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचे प्रमाण (केंद्र : राज्य) (७५ : २५) असे आहे. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता, मागणी क्र.डी-३, ०१, पीकसंवर्धन, १२०, इतर संस्थांना सहाय्य, (००)(२०) डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठास भारतीय कृषि अनुसंधान परिषद अर्थसहाय्यित योजनेंतर्गत सहायक अनुदान (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) (२४१५ १०९५) या लेखाशिर्षातंर्गत ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या बाबीकरीता एकूण रु.५००.०० लाख इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आली आहे.

भारतीय कृषि अनुसंधान परिषदेकडून दि.२७.१२.२०२३ अखेर केंद्र हिस्स्याचे ७५ टक्के प्रमाणे एकूण रु.६९३.३९ लाख इतके अनुदान दापोली कृषि विद्यापीठास प्राप्त झाले आहे. त्याप्रमाणे राज्य हिस्सा २५ टक्के नुसार निधी वितरणाचा प्रस्ताव संदर्भ क्र.२ नुसार सादर केला आहे. त्यानुषंगाने राज्य हिस्सा २५ टक्के नुसार रु.२३१.१३ लाख इतका निधी सन २०२३-२४ या वर्षाच्या तरतूदीमधून सुधारित अंदाजाच्या मर्यादेत दापोली कृषि विद्यापीठास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता, मागणी क्र.डी-३, ०१, पीकसंवर्धन, १२०, इतर संस्थांना सहाय्य, (००)(२०) डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठास भारतीय कृषि अनुसंधान परिषद अर्थसहाय्यित योजनेंतर्गत सहायक अनुदान (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) (२४१५ १०९५) या लेखाशिर्षातंर्गत ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या बाबीकरीता मंजूर तरतूदीमधून रु.२३१.१३ लाख (अक्षरी रु.दोन कोटी, एकतीस लाख, तेरा हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. याबाबतचा सविस्तर तपशिल खालीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे.

(रु.लाखात)

| अ. क्र. | योजना / लेखाशिर्ष / उपलेखाशिर्ष | सन २०२३-२४ करीता अर्थसंकल्पीत निधी | सन २०२३-२४ सुधारित अंदाज | वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१-पीकसंवर्धन, १२०- इतर संस्थांना सहाय्य, (००)(२०) भारतीय कृषि अनुसंधान परिषद अर्थसहाय्यित योजनेंतर्गत डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठास सहायक अनुदान (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) (२४१५ १०९५) ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) | ५००.०० | ५००.०० | **२३१.१३** |
| | **एकूण** | **५००.००** | **५००.००** | **२३१.१३** |

**२.** सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१. वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३,दि.०४.०३.२०२४ व दि.०८.१२.२०२३ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२. सदर योजनेकरीता प्राप्त झालेला निधी हा राज्य संवर्गासाठी मंजूर केलेला आहे. त्याच संवर्गासाठी खर्च होईल याची दक्षता घेण्यात यावी.

३. उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४. शासनाने मंजूर केलेल्या पदांपैकी जी पदे महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम, १९८३ आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम,१९९० मधील तरतूदीप्रमाणे भरलेली आहेत व

सदर पदे योजनेतर खर्चाने पुढे चालू ठेवण्यासाठी शासनाने मान्यता दिली आहे, अशा पदांच्या वेतन व भत्त्यांसाठीच विहीत अनुदान देय राहील.

५. प्रत्येक उपलेखाशीर्ष / गट/योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे / हिशोब ठेवावेत.

६. कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच, विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मूल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

७. विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम, १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम, १९९० आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता, १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिकाऱ्यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

८. सन २०२३-२४ मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

९. नियमबाह्य योजना पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

**३**. विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी उपरोक्त अटी व शर्तीचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

**४**. उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली, जि.रत्नागिरी या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान कृषि विद्यापीठाचे नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

**५**. याप्रित्यर्थ होणारा खर्च सन २०२३-२४ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**६**. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ व दि.०८.१२.२०२३ च्या परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३१९११०९०४७६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=22dfe162525b696c1facc3a8ddb26b639c76b455434e4cadbb3cd50474dcc58f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=60AE0791D92611A135CE51A5EE439203FDBDB395146D132620B3437EDED658CE, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2024.03.19 11:19:52 +05'30'

**( मिताली चौधरी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
२. वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
३. कुलगुरु / कुलसचिव, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली.
४. नियंत्रक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली.
५. सहायक लेखाधिकारी, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली.
६. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी,रत्नागिरी/उपकोषागार अधिकारी, दापोली,जि.रत्नागिरी.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
९. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१०.उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
११.उप सचिव / सह सचिव, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०००३२,
१२.उप सचिव, नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१३.उप सचिव, कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१४.कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.